लोकसभा सार्वत्रिक निवडणूक २००४
निवडणुकीच्या कामासाठी राज्यातील भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांनी करावयाच्या विमान प्रवासाबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्र. टीडीए–१००४/प्र.क्र.१३८/२००४/३३,
मंत्रालय, मुंबई–४०० ०३२.
दिनांक : ६ एप्रिल, २००४.

वाचा : भारत निवडणूक आयोगाचे पत्र क्र. इसीआय/जीइ–९८–४६४/ओबीएस/९८/पीएलएन–१, दिनांक ३१/१२/१९९७.

शासन निर्णय :

लोकसभा सार्वत्रिक निवडणुकीच्या कामानिमीत्त राज्यातील भारतीय प्रशासन सेवेच्या तसेच भारतीय महसूल सेवेच्या अधिकाऱ्यांना राज्याबाहेर निरीक्षक म्हणून नेमणुका करण्यात आल्या आहेत. त्यांना नेमून दिलेल्या कामासाठी विमान प्रवास करणे क्रमप्राप्त असल्यामुळे त्यांना विमान प्रवास अनुज्ञेय करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती. लोकसभा सार्वत्रिक निवडणूक २००४ साठी राज्याबाहेर राज्यातील भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांना निवडणुकांच्या कामासाठी कराव्या लागणाऱ्या विमान प्रवासास "एक विशेष बाब" म्हणून शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदरहू अधिकाऱ्यांना खाजगी विमान सेवेच्या अथवा सरकारी विमान सेवेच्या विमानाने विमान प्रवास करण्यास मुभा राहील.

२. हे आदेश निवडणूक कालावधी पुरतेच मर्यादित राहतील.

३. हे आदेश भारत निवडणूक आयोगाचे वरील संदर्भाधीन स्थायी आदेशानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. हयासाठी होणारा खर्च प्रधान शीर्ष "२०१५–निवडणूका", उपशीर्ष "१०५–संसदेच्या निवडणूका घेण्यासाठी लागणारा खर्च, (००) (०१) संसदेच्या निवडणूका घेण्यासाठी लागणारा खर्च, संकेतांक २०१५००५९, मागणी क्र. ए–२" या लेखाशिर्षाखालील सन २००४–२००५ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २२४/वि.सु.–१, दिनांक २९ मार्च, २००४ अन्वये दिलेल्या त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( के.व्ही.कुरुंदकर )
उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी,
महाराष्ट्र राज्य.

प्रति,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), महाराष्ट्र–१, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), महाराष्ट्र–२, नागपूर,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे,
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
५. मंत्रालयीन विभागातील सर्व प्रधान सचिव/ सचिव,
६. सर्व विभागीय आयुक्त,
७. सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी,
८. संचालक, लेखा व कोषागरे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. अवर सचिव (वित्तीय सुधारणा–१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती/(अर्थसंकल्प शाखा)/कार्यासन क्र.३३.

GR-200404161636300001-0100

shir, 4-3-4